संगणक संकेतांक क्र.20101222183112001

**विशेष आर्थिक क्षेत्र प्रस्तावांची छाननी करण्याकरिता उच्चाधिकार समिती गठित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,

शासन निर्णय क्र.विआक्षे-२००६/(११६०)/उद्योग-२,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक :- १० ऑगस्ट, २००६**

**प्रस्तावना :-** विशेष आर्थिक क्षेत्र स्थापन करण्याच्या प्रस्तावांची राज्य शासनाने शिफारस करणे आवश्यक असल्याची अट केंद्र शासनाच्या विशेष आर्थिक क्षेत्र अधिनियम २००५ च्या नियमांमध्ये घालण्यात आलेली आहे. त्यादृष्टीने प्रस्तावांची शिफारस करण्यापूर्वी विकासकांकडून क्षेत्र आरक्षणाबाबत, विशेष आर्थिक क्षेत्र पर्यावरणदृष्ट्या संवेदनशील क्षेत्रात प्रस्तावित केलेले आहे किंवा कसे, पाणी / वीज वगैरेसारख्या सर्व सुविधा उपलब्ध आहेत किंवा उपलब्ध होऊ शकतील, याबाबतची पूर्तता अपेक्षित असून याबाबतची शहानिशा केल्यानंतरच सदर प्रस्तावांची शिफारस केंद्र शासनास करण्यात येते. अशा प्रस्तावांची छाननी करण्यासाठी समिती नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विशेष आर्थिक क्षेत्र स्थापित करण्यासंदर्भातील प्रस्तावांची छाननी करण्याच्या कामकाजामध्ये पारदर्शकता असावी व अशी प्रकरणे जलद गतीने निकाली काढावीत यासाठी मा. मंत्री (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे विभागीय छाननी समितीचे गठन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) मा. मंत्री (उद्योग) | - | अध्यक्ष |
| २) प्रधान सचिव (नगर विकास) (१) | - | सदस्य |
| ३) प्रधान सचिव (महसूल) | - | सदस्य |
| ४) सचिव (उद्योग) | - | सदस्य |
| ५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ | - | सदस्य |
| ६) विकास आयुक्त (उद्योग) | - | सदस्य सचिव |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

छाया अग्निहोत्री

**( छाया अग्निहोत्री )**

कार्यासन अधिकारी.

प्रति,

१) मा. मंत्री (उद्योग)

२) प्रधान सचिव, नगर विकास (१)

३) प्रधान सचिव (महसूल)

४) सचिव (उद्योग)

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ

६) विकास आयुक्त (उद्योग)

७) विशेष कार्य अधिकारी (विशेष कक्ष) / ८) निवड नस्ती (उद्योग)

रोटा/एच-1365(100-08-2006)|.